श्री. प्र.ग.कुहीकर, निवडश्रेणी निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांची सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
शासन आदेश क्रमांक - वैमाशा-२०१९ /प्र. क्र. १६८(६) /ग्रासं-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २७ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ :- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८ / प्र.क्र.३०८ /१६ ब, दि.२१.१२.२०१९
२) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई यांचे पत्र क्र. वैमाशा/आस्था/ अ.ज./ अधि/२०१९/ २६८३, दि.३१.१२.२०१९

शासन आदेश :-

ज्याअर्थी, श्री.प्र.ग.कुहीकर यांना निवड समिती शिफारसपात्र उमेदवार म्हणून वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयात निरीक्षक या पदावर अ.ज. या प्रवर्गाकरीता राखीव असलेल्या जागेवर सन १९९१ पासून नियुक्ती दिली आहे;

ज्याअर्थी, श्री. प्र.ग.कुहीकर यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्ग या मागासप्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे;

ज्याअर्थी, मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ (चेअरमन अँड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरूध्द जगदीश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि.०६ जुलै, २०१७ रोजी जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांना सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे;

ज्याअर्थी शासन निर्णय, क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/ १६ ब दि.२१ डिसेंबर, २०१९ अन्वये शासन निर्णय क्र. बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६ ब, दि.१५ जून, १९९५, शासन निर्णय, क्र. बीसीसी- २००४/ प्र.क्र.४५/०४/१६- ब, दि.२४ जून, २००४, शासन निर्णय क्र.बीसीसी- २००२/ प्र.क्र.९३/०४/१६-ब, दि.३० जून, २००४, शासन परिपत्रक क्र.बीसीसी-२०१२/ प्र.क्र.३३२/ १६ ब, दि. ३० जुलै, २०१३, शासन परिपत्रक, क्र. बीसीसी -२०१५/ प्र.क्र.२७६A/१६- ब, दि.२१ ऑक्टोबर, २०१५ अधिक्रमित ठरविण्यात आले आहेत;

ज्याअर्थी श्री. प्र.ग.कुहीकर यांच्या सेवा शासन निर्णय क्र.बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६- ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ अनुसार या आदेशाच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात येत आहे;

त्याअर्थी श्री. प्र.ग.कुहीकर हे तात्पुरत्या स्वरूपात ११ महिन्यांकरीता अथवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर कार्यरत राहतील.

श्री. प्र.ग.कुहीकर यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यापूर्वी त्यांना जेवढे मासिक वेतन व भत्ते मिळत होते, तेवढे वेतन व भत्ते त्यांना पुढील आदेश होईपर्यंत देण्यात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२०१०२८१२१६५८२२०६ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.10.28 12:18:16 +05'30'

**(शे.भा.कुटे)**
**कक्ष अधिकारी**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**प्रति-**

श्री. प्र.ग.कुहीकर, निवडश्रणी निरीक्षक, वैधमापन शास्त्र (नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांच्यामार्फत)

**प्रत -**

१. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई
२. महालेखापाल -१/२ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल -१/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग
५. जिल्हा कोषागार अधिकारी,
६. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १६ ब)
७. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (कार्यासन नापु.१२)
८. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
९. निवडनस्ती - कार्यासन ग्रासं-३